**केंद्र शासनाने मंजूर केलेली एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प या योजनेकरीता राज्य प्रकल्प संचालक यांना नियंत्रण अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१४/प्र.क्र.२५५/का.६**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०७ नोव्हेंबर, २०१४

<u>वाचा :-</u> १) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२०१४/प्र.क्र.६८/का.०६, दिनांक ३०.०४.२०१४
२) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२०१४/प्र.क्र.४३(भाग-२)/ का.०६, दिनांक २२.०८.२०१४
३) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.एबावि-२०१४/प्र.क्र.२५५/का.०६, दिनांक १६.०९.२०१४

<u>प्रस्तावना :-</u>

जागतिक बँकेच्या सहाय्याने केंद्र शासनाने मंजूर केलेली एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प ही योजना राज्यात वाचा येथील १ अन्वये लागू करण्यात आली आहे. या योजनेकरीता राज्य प्रकल्प संचालक यांना विभाग प्रमुख तथा या योजनेसाठीच्या रायगड भवन, सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई येथील कार्यालयासाठी कार्यालय प्रमुख म्हणून वाचा येथील ३ अन्वये घोषित करण्यात आले आहे. या योजनेकरीता राज्य प्रकल्प संचालक यांना नियंत्रण अधिकारी व आहरण संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

जागतिक बँकेच्या सहाय्याने केंद्र शासनाने मंजूर केलेली एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प या योजनेचे राज्य प्रकल्प संचालक हे विभाग प्रमुख तसेच या योजनेसाठीच्या रायगड भवन, सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई येथील कार्यालयासाठी कार्यालय प्रमुख असून, आता त्यांना या योजनेकरीता नियंत्रण अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५.०५.२००९ च्या परिशिष्टातील भाग-१, उपविभाग-१, अनुक्रमांक-१ व अनुक्रमांक-३ मधील नियम क्र.२ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४११०७१७०००११४३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: CN = Dilip Babasaheb Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Women & Child Development
Reason: I am the author of this document
Date: 2014.11.10 15:11:35 +05'30'

**(दि. बा. पाटील)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. राज्य प्रकल्प संचालक, एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा प्रकल्प, रायगड भवन, नवी मुंबई
२. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई
३. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. सचिव, लेखा व कोषागारे, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सर्व विभागीय आयुक्त
६. सर्व जिल्हाधिकारी
७. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
८. सर्व आयुक्त, महानगरपालिका
९. सर्व विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास विभाग,
१०. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
११. सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी (बाल कल्याण), जिल्हा परिषद
१२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१५. सहाय्यक संचालक (वित्त व लेखा), महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१७. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने
१९. निवड नस्ती (कार्यासन ६)